**नागरिकांमध्ये मास्क वापराबाबत**
**जागृकता निर्माण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१५७/नवि-२०**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- २ नोव्हेंबर, २०२०.

**प्रस्तावनाः-**

केंद्र व राज्य सरकारने कोरानाच्या पार्श्वभूमीवर कोरोना संसर्ग टाळण्याकरिता मास्क वापरण्यासाठीच्या अनेक सूचना दिलेल्या आहेत. लॉकडाऊन उठविल्यामुळे नागरिक उद्योग धंदे, व्यापार व्यवसायासाठी मोठ्या प्रमाणावर बाहेर पडत आहेत. विशेषतः नागरी भागांमधील नागरिक बाहेर पडताना मोठ्या संख्येत मास्क किंवा प्रतिबंधात्मक उपायांचा अवलंब करताना दिसत नाही. त्यामुळे कोविड-१९ वर नियंत्रणासाठी करण्यात आलेल्या उपाययोजना प्रभावी ठरणार नाहीत, ही वस्तुस्थिती आहे.

नागरिकांनी मास्क वापराशिवाय बाहेर पडू नये, यासाठी उपाययोजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रकः-**

नागरिकांमध्ये मास्क वापराबाबत जागृकता निर्माण करण्याकरीता खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

(१) नागरिकांनी मास्कशिवाय बाहेर पडू नये. यासाठी सर्व महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपंचायतींनी विशेष मोहीम राबवावी. यामध्ये मास्क वापरण्यासंदर्भात व्यापक प्रचार, प्रसार व प्रसिद्धी विविध माध्यमांद्वारे करणे. जसे जागोजागी, मोक्याच्या ठिकाणी बॅनर लावणे.

(२) सदर मोहिम यशस्वी करण्यासाठी आयुक्त / मुख्याधिकारी यांनी विशेष दक्षता घेऊन सदर मोहिम राबविण्यात यावे.

(३) मोहिम राबविताना त्यामध्ये सर्व सामान्य नागरिकांचा सहभाग कसा वाढेल, यासाठी नाविन्यपूर्ण कल्पनांचा अवलंब करावा.

(४) या उपरोक्ष जे नागरिक मास्क किंवा प्रतिबंधक उपायांचा अवलंब करण्याकडे दुर्लक्ष करीत असतील, अशा नागरिकांवर नियमानुसार दंडात्मक कार्यवाही करण्यात यावी.

(५) मास्क नाही प्रवेश नाही (No Mask-No Entry) या बाबत विशेष मोहीम राबवावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा संगणक संकेतांक २०२०११०२१६००५४१३२५ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shankar Trambak
Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=65f3f4695111ee4b72455e21ef9099788d9b999ffbcaaa070711f14d2a10e138, serialNumber=c83ebbb277c2e72c85231b87f684c424a13c398a4f921b6d167a8c859e9817f5, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2020.11.02 16:02:53 +05'30'

**( शं. त्र्यं. जाधव )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती.
९. निवडनस्ती (नवि-२०)